**संसदीय कार्य विभागासाठी स्कॅनर खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लेसाख ०४१९/प्र.क्र.४/तीन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २२ जानेवारी, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग३/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट २०१७
३) कार्यालयीन आदेश, संसदीय कार्य विभाग, क्रमांक राअभा ६०१८/ प्र.क्र.२/तीन दिनांक ३ ऑगस्ट २०१८

**प्रस्तावना :-**

संसदीय कार्य विभागातील दैनंदिन कामकाज व विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाची तातडी विचारात घेऊन संसदीय कार्य विभागासाठी १ स्कॅनर खरेदी करण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे. त्यानुषंगाने, खरेदी प्रक्रिया पार पाडण्यासाठी शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलवर या विभागाची खरेदीदार विभाग म्हणून नोंदणी करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील आदेशान्वये विभागासाठी खरेदी अधिकारी तथा वस्तु ताब्यात घेणारा (Consignee) अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी व पडताळणी अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली आहे. अशाप्रकारे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निश्चित केलेल्या धोरणाच्या अधीन राहून संसदीय कार्य विभागासाठी आवश्यक असलेल्या १ स्कॅनर खरेदीची प्रक्रिया करावयाची आहे. त्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संसदीय कार्य विभागाचे दैनंदिन कामकाज व विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाची तातडी विचारात घेता, संसदीय कार्य विभागासाठी विहीत कार्यपद्धतीचा अवलंब करुन १ स्कॅनर, उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतुदीनुसार गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलद्वारे खरेदी करण्यास याद्वारे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर बाबीवर होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर निधी मधून करण्यात येईल.

**लेखाशिर्ष** : 'मागणी क्रमांक - पी - १
मुख्यलेखाशिर्ष २०५२ - सचिवालय - सर्वसाधारण सेवा
०९० - सचिवालय,
(००)(०१) संसदीय कार्य विभाग (अनिवार्य)
संकेतांक (२०५२ ०२६८)
१७, संगणक खर्च '

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ १३ / विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग - पहिला, उपविभाग दोन मधील अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक ७६ खाली प्रशासनीक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांच्या अधीन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१०५६०८१८१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarfare Ramesh Sakharam

Digitally signed by Sarfare Ramesh Sakharam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=52e560d0b76dfea3392e26761deeb6b2efc5f1bea42c0dffdc1d69d316ae65a8, serialNumber=0c7001609c3ef1f1a1774b5223846fb28e7bf476529c879e1fd04746bfa60fd7, cn=Sarfare Ramesh Sakharam
Date: 2020.01.24 10:36:44 +05'30'

**( र. स. सरफरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई.
७. आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (कार्या.उद्योग-४), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, वित्त विभाग, (कार्या.कोषा प्रशा-५) मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (संसदीय कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती.